१% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रकमा संबंधित महानगरपालिकांना वितरीत करण्याबाबत.
सन २०२२-२३..

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- मुद्रांक-०३२२/प्र.क्र.१७/नवि-३२,**
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दिनांक: २८ मार्च, २०२३.

**संदर्भ :-**

(१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४ जून,२०२१.
(२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/ अर्थ-३, दि. ०४ एप्रिल, २०२२.
(३) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१३/नवि-३२, दि.१७.०३.२०२२.
(४) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१७/नवि-३२, दि.२९.०४.२०२२.
(५) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१७/नवि-३२, दि.१४.०९.२०२२.
(६) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१७/नवि-३२, दि.०९.११.२०२२.
(७) शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्र. मुद्रांक-२०२०/प्र.क्र.१७/नवि-३२, दि.३१.०१.२०२३.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम (१९४९ चा ५९) याच्या कलम १४९ अ मध्ये सुधारणा करण्यात आली असून यामध्ये महाराष्ट्र मुद्रांक अधिनियम (१९५८ चा ६०), याअन्वये स्थावर मालमत्तेची अनुक्रमे विक्री, देणगी व फलोपभोग गहाण यासंबंधी संलेखांवर बसवावयाच्या मुद्रांक शुल्कात, जर असा कोणताही संलेख हा, शहरात स्थित असलेल्या स्थावर मालमत्तेच्या संबंधातील असेल तेव्हा, विक्री किंवा देणगीसंबंधीच्या संलेखाच्या बाबतीत, अशा स्थित असलेल्या मालमत्तेच्या मूल्यावर, आणि फलोपभोग गहाणासंबंधीच्या बाबतीत, संलेखात मांडण्यात आलेल्या त्या संलेखाद्वारे प्रतिभूत केलेल्या रकमेवर, एक टक्का या दराने अधिभार आकारण्यात येतो. या अनुषंगाने सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात नागपूर महानगरपालिकेस देय असलेली १% मुद्रांक शुल्क अधिभारामुळे जमा होणाऱ्या रक्कमेपैकी, रु.५०.०० लक्ष रक्कम संबंधित महानगरपालिकेस वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१% मुद्रांक शुल्कापोटी सन २०२२-२३ मधील नागपूर महानगरपालिकेस वितरीत करण्याकरीता अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर उपलब्ध अनुदानाच्या मर्यादेत महानगरपालिकेस एकुण रक्कम रु. **५०,००,०००/-** (अक्षरी रूपये पन्नास लक्ष मात्र) खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे:-

**सन २०२२-२३ करीता नागपूर महानगरपालिकेस १% मुद्रांक शुल्कापोटी वितरीत करावयाचे अनुदान**

| अ.क्र. | महानगरपालिकांचे नाव | सन २०२२-२३ मधील रक्कम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | नागपूर | ५०,००,००० |

०२. सदर अनुदान उपरोल्लेखित महानगरपालिकांना वितरीत करण्यासाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. **जिल्हाधिकारी यांनी मनपांना देय असलेल्या रकमेमधून कोणत्याही प्रकारची कपात न करता (शासनाने कळविल्याशिवाय) सदर अनुदान आहरण करून संबंधित महानगरपालिकांना १० दिवसांत वितरीत करावे.**

०३. सदर १% अधिभारापोटी जमा रकमेचा तसेच त्यापोटी वितरीत करण्यात येणाऱ्या या सहायक अनुदानावरील खर्चाचा हिशोब संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी स्वतंत्रपणे ठेवावा व याबाबतचे लेखे व तत्संबंधी सर्व

कागदपत्रे महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई व महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना, आवश्यकतेप्रमाणे उपलब्ध करुन द्यावीत.

०४. याकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक एफ-४, ३६०४, स्थानिक स्वराज्य संस्था व पंचायत राज संस्था यांना नुकसानभरपाईच्या व अभिहस्तांकित रकमा देणे, १०२, मुद्रांक शुल्क (०१) जकात रद्द केल्यामुळे मुद्रांक शुल्काचे अभिहस्तांकन (०१)(०१) स्थानिक संस्था करांऐवजी जकातीचे पुन:स्थापन केल्यामुळे महानगरपालिका क्षेत्रामधील मुद्रांक शुल्कावरील १ टक्के अधिभार महानगरपालिकेसाठी देण्याच्या दृष्टिने (३६०४०९२४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षाखाली खर्ची घालून तो सन २०२२-२३ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

०५. प्रमाणित करण्यात येते की, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/ अर्थ-३, दिनांक ०४ एप्रिल, २०२२ व शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक- अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८ /अर्थ-३, दि. २४ जून, २०२१ मधील सर्व अटी व शर्तींची पूर्तता होत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०३२८१८५५२४९१२५ असा आहे.

०७. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
Date: 2023.03.28 19:01:23 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव**
**नगर विकास विभाग**

**प्रति,**

१. संबंधित जिल्हाधिकारी.
२. आयुक्त संबंधित महानगरपालिका.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) (मुंबई/नागपूर).
४. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६. संबंधित जिल्ह्याचे जिल्हा कोषागार अधिकारी.
७. नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य पुणे.
८. वित्त विभाग व्यय-३/अर्थोपाय/अर्थ-१६, मंत्रालय, मुंबई.
९. मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव.
११. कार्यासन अधिकारी, नगर विकास विभाग (नवि-४), मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (नवि-३२).